राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मान्य कृती आराखडयामधील अनुदानातून राज्यातील निवडक आरोग्य संस्थांमध्ये Free Diagnostics Scheme अंतर्गत सोनोग्राफी सविर्सेस सेवा बाह्य संस्थांकडून उपलब्ध करुन घेण्याकरीता करावयाच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.०४/आरोग्य-७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०००01.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/खरेदीकक्ष/टे-२/नस्ती क्र.४४/सोनोग्राफी सेवा/प्रशासकीय मान्यता/७४-७५/२०१९, दिनांक १४ जानेवारी, २०२०.

२) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक १९ सप्टेंबर, २०१९ रोजीची मान्य टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मान्य कृती आराखडयामधील अनुदानातून राज्यातील निवडक आरोग्य संस्थांमध्ये Free Diagnostics Scheme अंतर्गत सोनोग्राफी सविर्सेस सेवा बाह्य संस्थांकडून उपलब्ध करुन घेण्याकरीता करावयाच्या निविदा प्रक्रियेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

Free Dignostic Scheme या योजनेंतर्गत Laboratory Serices, Radiology Services, CT-Scan Services या बाह्य संस्थेमार्फत उपलब्ध करुन देण्याबाबत केंद्र शासनाच्या सूचना आहेत. त्यानुषंगाने सद्यस्थितीत Laboratory Serices करीता राज्यात विहित निविदा प्रक्रिया करुन मे.एच.एल.एल.लाईफकेअर लि. या सेवा पुरवठादाराची नियुक्ती करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर जननी शिशू सुरक्षा कार्यक्रमांतर्गत सर्व गरोदर तथा प्रसुत पश्चात ४२ दिवसापर्यंतच्या मातांच्या

प्रयोगशाळेतील आवश्यक त्या तपासण्या व सोनोग्राफी तपासणीकरीता वार्षिक अंमलबजावणी कृती आराखडा सन २०१९-२० मध्ये FMR Code ६.४.३ या लेखाशिर्षांतर्गत “Free Digonstics for pregnant women under JSSK” अंतर्गत रु.४१२३.७० लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर उपलब्ध अनुदानातून राज्यातील २३ जिल्हा रुग्णालये व १०० उपजिल्हा रुग्णालयांकरीता सोनोग्राफी सेवा बाह्य सेवा पुरवठादारांमार्फत निविदा प्रक्रिया करुन उपलब्ध करुन देण्याकरीता प्रशासकीय मान्यतेस्तव प्रस्ताव सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांनी सादर केलेला आहे. तसेच सदर प्रस्तावास आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सोनोग्राफी सेवा प्राप्त करण्यासाठी बाह्य सेवा पुरवठादाराची निवड करण्यासाठी निविदा प्रक्रियेस पुढील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

**अनुदानाचा व प्रस्तावाचा तपशिल**

| FMR Code | Name of Head | Approved Budget & GOI Remarks | Procurement Proposal |
|---|---|---|---|
| PIP 2019-20 FMR Code 6.4.3 | Free Dignostics for pregnant women under JSSK. | **Approved Budget Rs.4123.70 Lakhs**<br><br>**GOI Remarks :-**<br>Approved for 1847927 beneficiaries @ Rs.200/- beneficiary. This includes budget for all diagnostics (including one USG) for all pregnant women receiving ANC services. Additionally Rs.486.4 lakhs recommended for additional investigations and 2nd USG for estimated 15% high risk pregnancies @ Rs.200/- beneficiary. | Sonography Services Project - Empanelment of Third party Agency for time bound Interpretation of Sonography as per RFP Document<br>Total Amt. Rs.897.90 Lakhs Approx. per Year. ( i.e. 123 Hosp. X @ Rs.200 per USG X 365 Days) |

सोनोग्राफी सविर्सेस सेवा प्राप्त करुन घेण्यासाठी बाह्य संस्थेची निवड निविदा प्रक्रियाद्वारे करण्यात यावी. सदर सोनोग्राफी सविर्सेस अंतर्गत आरोग्य संस्थामार्फत जागा उपलब्ध करुन (सेवा कालावधी पुरतीच) देण्यात येणार असून नियुक्त करण्यात येणाऱ्या बाह्यसेवा पुरवठादाराने संबंधित आरोग्य संस्थांमध्ये सोनोग्राफी मशीन बसविणे, मशीनमधून घेण्यात येणाऱ्या छायाचित्रांचे Interpretation, Diagnosis करुन अहवाल तयार करणे, मनुष्यबळ (Technician and Radiologist)

उपलब्ध करुन देणे, चाचणी करण्यात आलेल्या रुग्णांचा अहवाल त्याच दिवशी वैद्यकीय दृष्टया साधारण/ नियमित निकषाबाबत सोनोग्राफी असल्यास सदरचा अहवाल त्वरीत देणे व गर्भासंदर्भात गुंतागुंतीचे विश्लेषण अभिप्रेत असल्यास किमान ६ तासांच्या आत रुग्णालयास उपलब्ध करुन देणे, प्रकल्पाच्या नियंत्रणासाठी ऑनलाईन सॉफ्टवेअर (Dash board) उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील. तसेच यशस्वी सेवा पुरवठादाराकडून पुढील ५ वर्षाकरीता निविदा दस्तऐवजातील अटी व शर्तीनुसार करार करणे अपेक्षित राहील. तृतीय पक्षाकार मुल्यांकन अहवाल (Third Party Evaluation Report) समाधानकारक असल्यास त्यास पुढे २ वर्षापर्यंत मुदतवाढ देता येईल. तसेच एकाही रुग्णांच्या बाबत अतिरिक्त शुल्क आकारल्याबाबत तक्रार आल्यास संबंधिताचा करार रद्द करण्यात येईल, या अटीचा निविदा दस्तऐवजात समावेश करण्यात यावा.

**अटी :-**

१) सदर सोनोग्राफी सविर्सेस अंतर्गत बाह्य संस्था नियुक्त करण्याच्या बाबीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदर सोनोग्राफी सेवांतर्गत सेवा पुरवठादाराने दिवसाला किमान १० USG करणे अनिवार्य राहील.

३) प्रथम संदर्भसेवा केंद्राच्या कार्यक्षेत्रातील लाभ घेणाऱ्या अपेक्षित गरोदर मातांच्या संख्येच्या प्रमाणात सोनोग्राफी मशीन किंवा सोनोलॉजिस्टची संख्या निश्चित करण्यात यावी.

४) सोनोग्राफी मशीनचे विनिर्देश वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय, दिनांक ३१.१०.२०१७ च्या तरतुदीनुसार सहसंचालक (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा, मुंबई यांनी निश्चित करावेत. सदरहू बाबीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी

करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

६) प्रशासकीय मान्यता देतानांचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority (NPPA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनत्तम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनत्तम दर विचारात घेऊन त्या दरांना अंदाजित दर म्हणून गृहित धरण्यात यावे व त्यानूसार निविदेकरीता मागणी नोंदवितांना साहित्य सामुग्री, तद्नुषंगिक वस्तु व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

७) सोनोग्राफी सविर्सेसकरीता बाह्यसेवा पुरवठादाराची निविड करतानांच्या निविदा दस्तऐवजात समाविष्ट करावयाच्या कामाचा गोषवारा व सेवेच्या अटी, शर्तीबाबतचे नियम आयुक्तालयाकडील अस्तित्वात असलेल्या निविदा दस्तऐवज छाननी समितीमार्फत अंतिम करुनच निविदा विषयक पुढील कार्यवाही करण्यात यावी.

८) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील केंद्र शासनाने मंजूर केलेल्या कृती आराखडयामध्ये FMR Code 6.4.3 या लेखाशिर्षांतर्गत रु 4123.70 लक्ष इतका निधी मंजुर झालेला आहे. सोनोग्राफी सेवा प्राप्त करण्यासाठी या योजनेंतर्गत प्रस्तावित १२३ आरोग्य संस्थांकरीता येणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत मंजुर पीआयपीतील सदर बाबीच्या विनियोगाकरीता राखून ठेवण्यात आलेल्या अनुदानातून अनुदानाच्या विहित मर्यादेतच भागविण्यात यावा. सदरची बाब प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी कार्यक्रम प्रमुखांची राहील.

९) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

१०) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

११) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१२) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -

२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १२ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई, सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202001301411027217 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.02.14 16:21:54 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.

६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.

७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)

८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)

९) निवडनस्ती (आरोग्य-७)